सांकेतिक क्रमांक- 201412011303202327

कावलवाडी साठवण तलाव ता.अहमदपूर, जि.लातुर या योजनेस सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. लपात २११२/(४४०/१२)/लपा-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८/१०/२०१३

**पहावे** : १) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र गोमपाविम/ता-४/कावलवाडी सा.त./सुप्रमा/१०३७१, दि.२७.०९.२०१२

**प्रस्तावना :**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळा अंतर्गत असलेल्या कावलवाडी साठवण तलाव ता.अहमदपूर , जि.लातुर या योजनेस महामंडळ निर्णय क्र. गोपाविम प्रमा/तां-४/कावलवाडी सा.त./३. दि.०८/०२/२००६ अन्वये एकूण अंदाजित खर्च रु.४२९.०४ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली . यापैकी रु.३६४.८७ लक्ष कामाप्रीत्यर्थ आणि रु.६४.१६ लक्ष अनुषंगिक खर्च आहे. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००३-०४ च्या दरसूचीप्रमाणे अनुज्ञेय दर वापरण्यात आले होते. योजनेच्या कामास सन २००८ मध्ये सुरूवात झाली. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या किंमतीत दरसूचीतील वाढ , भूसंपादन खर्चातील वाढ, जास्त दराची निविदा स्विकृती,संकल्पनातील बदल व इतर कारणांमुळे प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीच्या दहा टक्क्याहून अधिक वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे बाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

कावलवाडी साठवण तलाव ता.अहमदपूर , जि.लातुर या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये ७४१.४५ लक्ष (रु.सात कोटी, एकेचाळीस लक्ष, पंचेचाळीस हजार, फक्त) किंमतीस, योजनेची उर्वरित कामे सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीत पुर्ण करण्याचे, या अटीच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर रकमेपैकी रुपये ६९१.२८ लक्ष (रुपये सहा कोटी, एक्यान्नव लक्ष, अठ्ठावीस हजार, फक्त) कामाप्रीत्यर्थ व रुपये ५०.१७ लक्ष (रुपये, पन्नास लक्ष, सतरा हजार, फक्त) अनुषंगीक खर्च आहे. अंदाजपत्रकात कामासाठी सन २०१०-११ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०-सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान योजनांतर्गत, संगणक सांकेतांक क्र. ४७०२ ४९९ २" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

ठळक बाबी

अ) या योजनेची सिंचन क्षमता ४११ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा २१६२.२४ सघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु.३४,२९१/- (मापदंड रु.४१४७२ /- )

ड) आर्थिक परतावा दर ११.९८

हा निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३३/१४३४, दि.३.६.२०१३ अन्वयं व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १५९/व्यय-१२, दि. ७.७.२०१३ नुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (२४/२०१३) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( रा.बा. क्षीरसागर)
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी.

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३ २
नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ,परळी वैजनाथ
कार्यकारी अभियंता, लातुर पाटबंधारे विभाग, लातुर
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, लातुर
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
लपा-२, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : लपात २११२/(४४०/१२)/लपा-२, दि. २८/१०/२०१३ चे परिशिष्ट

कावलवाडी साठवण तलाव ता.अहमदपूर, जि.लातुर

उपशिर्षनिहाय तरतूदी

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (रूपये लाखात) |
|---|---|---|
| १. | 'ए' प्रार्थमिक | ३.०० |
| २. | 'बी' भूसंपादन | १८९.५३९ |
| ३. | 'सी' कामे | ४४२.४८३ |
| ४. | 'डी' विमोचक | ----------- |
| ५. | 'के' इमारत | १.०० |
| ६. | 'एम' वृक्षरोपन | १.०० |
| ७. | 'ओ' संकिर्ण | १.०० |
| ८. | 'पी' देखभाल | १.०० |
| ९. | 'आर' दळणवळण | ५२.२५७ |
| १० | कामाप्रित्यर्थ किंमत | ६९१.२८ |
| ११ | आनुषंगिक खर्च | ५०.१७ |
| १२ | **योजनेची एकूण किंमत** | ७४१.४५३ |